**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणामार्फत अल्पत्य उत्पन्न गटासाठी राज्यामध्ये मुंबई व्यतिरिक्त इतर ६१ नागरी क्षेत्रामध्ये ५०,००० सदनिका बांधण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन.

शासन निर्णय क्र.एचएसजी २०००/प्र.क्र.६०/गृनिधो-१.
**गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : ११ ऑगस्ट, २०००

संदर्भ :- १)शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. बीसीएच-१०९६/प्र.क्र.६११/मावक-२,दिनांक १.४.१९९८.
२) शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.सुविधा १०९७/सीआर ४५६३/झोपसु-१, दि.१ ऑक्टोबर १९९९.
३) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाचे पत्र, क्र.एमएच/सीई-२/१४३/(ओईएन)/२६१/ए-५. दि.२१.२.२०००.
४) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्रमांक-एलजीएल १०८१/८७४४/प्र.क्र.१४४७/ग-५. दिनांक १६.२.१९८५. तसेच शासन परिपत्रक क्रमांक एलएनडी १०९५/२६/प्र.क्र.४८/ज-१, दिनांक६.२.१९९७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यामध्ये वाढते औद्योगिकीकरण व शहरीकरणामुळे शहरामध्ये झोपडपट्ट्यांची बेसुमार वाढ होत आहे. पुरेशा नागरी सुविधांच्या अभावामुळे तेथील वातावरण आरोग्यास हानीकारक होत आहे. झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी शासनामार्फत कल्याणकारी धोरणांअन्तर्गत अनेक योजना राबविल्या जातात. तेथील पर्यावरणाचा समतोल राखण्यासाठी ,झोपडपट्टी श्रेणीवाढ करुन, झोपडपट्टीमध्ये राहणा-या आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील लोकांच्या जीवनामध्ये आमुलाग्र परीवर्तन घडवून आणण्यासाठी शासन सतत प्रयत्नशिल आहे. राष्ट्रीय गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रमान्तर्गत केंद्रशासनाकडून उपलब्ध होणा-या निधीतून झोपडपट्टीवासियांना पाच प्रकारच्या मूलभूत नागरी सुविधा पुरविल्या जातात. तथापि केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सदर योजनेन्तर्गत उपलब्ध होणा-या निधीतून किमान १० टक्के रक्कम घरबांधणी करीता खर्च करणे अपेक्षित असते. तसेच शासनाच्या राष्ट्रीय गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रम, घरकूल योजना, सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना, इत्यादी योजना एकत्रितपणे राबविण्याच्या दृष्टीकोनातून प्रस्तुत योजनेद्वारे ५०,००० यापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या मुंबई व्यतिरिक्त राज्यातील इतर ६१ शहरामध्ये मोठया प्रमाणावर सदनिका बांधण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

GR- 2002012215585 1000 - 1700

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणामार्फत अत्यल्प उत्पन्न गटातील लाभार्थ्यांकरीता राज्यामध्ये अभिकरण तत्वावर मुंबई व्यतिरिक्त इतर ६१ अर्ध नागरी व नागरी क्षेत्रामध्ये (जोड पत्र १ ) प्रथम टप्प्यात ५०,००० सदनिका बांधण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर योजनेखाली बांधावयाच्या सदनिकांची संख्या, त्याकरीता येणा-या खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**एकूण सदनिका -५०,०००**

| मागासवर्गीयांसाठी एकूण सदनिका -३०,००० | एकूण खर्च | अमागासवर्गीयांसाठी एकूण सदनिका -२०,००० | एकूण खर्च |
|---|---|---|---|
| एका सदनिकेची किंमत - रु.३०,००० | | १) एका सदनिकेची किंमत रु.३०,००० | |
| अ)दि.१.४.९८ च्या समाज कल्याण विभागाच्या शासन निर्णयान्वये समाज कल्याण विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून सबसिडी - प्रत्येकी रु.९,००० | रु.२७ कोटी | २) एनएसडीपी मधून सबसिडी प्रत्येकी रु.१०,००० | रु.२० कोटी |
| ब)एन.एस.डी.पी.मधून -प्रत्येकी रु. ११,००० | रु.३३ कोटी | | |
| लाभार्थ्यांचा हिस्सा - प्रत्येकी रु.५००० | रु.१५ कोटी | ३) लाभार्थ्यांचा हिस्सा - प्रत्येकी रु.५००० | रु.१० कोटी |
| कर्ज - प्रत्येकी रु.५००० | रु.१५ कोटी | ४) कर्ज - प्रत्येकी रु.१५,००० | रु.३० कोटी |
| एकूण रुपये- | रु.९० कोटी | एकूण रुपये- | रु.६० कोटी |

उपरोक्त एकूण रु. १५० कोटी (रुपये एकशे पन्नास फक्त) पैकी रु. ८०/- कोटी अनुदान स्वरुपाचे असून, त्यापैकी रु.२७ कोटी अनुदान दिनांक १.४.१९९८ च्या समाज कल्याण विभागाच्या शासन निर्णयान्वये, समाजकल्याण विभागामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात येईल. आणि रु.५३/- कोटी राष्ट्रीय गलिच्छ वस्ती सुधारणा कार्यक्रम (एन.एस.डी.पी.) मधून या विभागामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात येईल.

GR- 200201221558 51000-1700

शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.बीसीएएच १०९६/प्र.क्र.६२९/मावक-२, दि.१.४.१९९८ अन्वये पात्र मागसवर्गीय लाभार्थी म्हणजेच अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील पात्र लाभार्थ्यांना प्रत्येकी रु. ९,०००/- समाज कल्याण विभागामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून व रु.११,००० एन.एस.डी.पी. मधून असे एकुण रु. २०,०००/- अनुदान देण्यांत येईल.

पात्र अमागासवर्गीय लाभार्थ्यांना प्रत्येकी एकुण रु.१०,०००/- प्रमाणे राष्ट्रीय गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रमाखाली (एन.एस.डी.पी.) अनुदान देण्यात येईल. एन.एस.डी.पी. मधून देण्यांत येणारे अनुदान राज्य नागरी विकास यंत्रणेच्या मान्यतेने तसेच केंद्र शासनाकडून निधी उपलब्ध झाल्यानंतर अदा करण्यात येईल. शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.सुविधा १०९७/सीआर ४५६३/झोपसु-१,दिनांक १ ऑक्टोबर,१९९९ मधील मार्गदर्शक तत्वाप्रमाणे आवश्यक ती कार्यवाही म्हाडा/जिल्हा गृहनिर्माण समितीमार्फत करण्यात यावी.

सदर रु. ८० कोटी (रुपये ऐंशी कोटी फक्त) अनुदानापैकी रु. ५३ कोटी (रु.त्रेपन्न कोटी फक्त) (एनएसडीपी मधील) अनुदानाची रक्कम बांधकाम सूरु करण्यापूर्वी म्हाडाकडे जमा करण्यांत येईल. व रु. २७ कोटी (रु.सत्तावीस कोटी फक्त) अनुदान लाभार्थ्यांच्या संख्येनुसार बांधकामाची प्रगती पाहून टप्या-टप्याने समाज कल्याण विभागामार्फत देण्यांत येईल. त्यानंतर म्हाडामार्फत सदर रक्कम म्हाडा व लाभार्थ्यांच्या संयुक्त बचत खात्यात (जॉईंट अकाऊंट) जमा करुन, कामाची प्रगती पाहून लाभार्थ्यांना अदा करण्यात येईल.

३. सदर सदनिका, मुंबई व्यतिरिक्त इतर ६१ अर्ध नागरी व नागरी भागामध्ये जेथे झोपडपट्टी आहे तेथे शक्य असल्यास, झोपडपट्टी श्रेणीवाढ योजनेंतर्गत राबविण्यात येईल. तसेच इतर ठिकाणी जिल्हाधिका-यांमार्फत नाममात्रदराने जमीन उपलब्ध करुन घेऊन त्यावर ही योजना राबविण्यात येईल (संदर्भ क्रमांक-४नुसार). या योजनेमध्ये लाभार्थ्याने धारण केलेल्या झोपडीच्या आकारमानानुसार इन्क्रिमेंटल हाऊसिंग स्कीम अंतर्गत सदनिकेचे आकारमान कमाल २२५ चौ.फुट राहील.

४. सदर योजना राबविण्यासाठी म्हाडाला अभिकरण शुल्क म्हणून ५ टक्के रक्कम समाज कल्याण विभागामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून आणि राष्ट्रीय गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रम (एन.एस.डी.पी.)च्या निधीमधून देण्यात येईल. सदर अभिकरण शुल्क रु.३०,०००/- (एका सदनिकेची किंमत) व्यतिरिक्त राहील.

५. या योजनेची अंमलबजावणी योग्य रितीने व्हावी याकरिता जिल्हा पातळीवर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा गृहनिर्माण समिती नियुक्त करण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा व अधिकार **जोडपत्र २** मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

GR- 20020122155851000-1700

समितीचं स्वरुप :

सदर समितीचे स्वरुप खालीलप्रमाणे राहील :-

१) अध्यक्ष - जिल्हाधिकारी

२) इतर सदस्य - स्थानिक नगरपालिकेचे अध्यक्ष व मुख्य अधिकारी,
महानगर क्षेत्रामध्ये महापौर व आयुक्त,
जिल्हापरिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा समाज कल्याण अधिकारी,

३) सदस्य सचिव - म्हाडाचा स्थानिक अधिकारी.

म्हाडाच्या स्थानिक अधिका-याला जिल्हा गृहनिर्माण अधिकारी (डिस्ट्रिक्ट हाऊसिंग ऑफिसर ) असे संबोधण्यात येईल.

६. प्रस्तावित योजनेसाठी लागणा-या सामायिक सुविधा जसे पाणी, वीज, मलनिःसारण, रस्ते संबंधित संस्थेमार्फत विविध योजनेखाली उपलब्ध होणा-या निधीतून पुरविण्यात येतील.

७. या योजनेचा आढावा संबंधित पालक मंत्री यांच्यामार्फत घेण्यांत येईल. तसेच कामकाजाचा आढावा घेण्याचे अधिकार जिल्हा नागरी विकास यंत्रणेस (डुडा) असतील.

८. सदर योजना राबविण्यासाठी म्हाडामार्फत हुडको वा तत्सम वित्तीय संस्थाकडून रु.४५/- कोटी कर्ज घेण्यात येईल. या कर्जासाठी शासन हमी देईल.

९. ही योजना राबविण्याकरीता म्हाडामार्फत १० इमारत निर्मिती केंद्राची स्थापना करण्याचे प्रस्तावित आहे. तथापि हया योजनेची अंमलबजावणी इमारत निर्मिती केंद्राच्या उभारणीसाठी प्रलंबित ठेवू नये. या इमारत निर्मिती केंद्राच्या उभारणीसाठी हुडको,केंद्र शासन व बँक यांचेमार्फत कर्ज व अनुदानाची व्यवस्था म्हाडामार्फत करण्यात येईल. एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रमाअंतर्गत उभारलेले इमारत निर्मिती केंद्र उपलब्ध असल्यास, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत गरजेनुसार या योजनेकरीता उपलब्ध करुन देण्यांत येईल.

१० या योजनेंतर्गत होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखालील उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात येईल.

१) गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,

"मागणी क्रमांक क्यू-४ "२२१६- गृहनिर्माण-८०, सर्वसाधारण-१०३, गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (अकरा) राष्ट्रीय गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रम (२२१६११४९)"

GR- 200201221558 51000 - 1700

२) समाज कल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
"मागणी क्रमांक एन-५ २२१६, गृहनिर्माण ०२, नागरी गृहनिर्माण ०३, १०४ सहकारी गृहनिर्माण (२) पंचवार्षिक योजनेन्तर्गत योजना सहकारी गृहनिर्माण संस्थांना वित्तीय सहाय्य (१) अनुसुचित जाती (विघयो) (२२१६०४५६)"

३) विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग "मागणी क्र.झेडब्ी-२, २२१६ गृहनिर्माण ०२ नागरी गृहनिर्माण १०४, सहकारी गृहनिर्माण (२) पंचवार्षिक योजनेन्तर्गत योजना (१) सहकारी गृहनिर्माण संस्थांना वित्तीय सहाय्य ४३ अर्थसहाय्य (२२१६११२१)"

४) आदिवासी विकास विभाग,
"मागणी क्रमांक टी-५, २२१६-गृहनिर्माण, पंचवार्षिक योजनेन्तर्गत योजना, जनजाती क्षेत्र उपयोजना ०३ ग्रामीण गृहनिर्माण, १०४ सहकारी गृहनिर्माण संस्था, मागासवर्गीयांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थेस आर्थिक सहाय्य (ए) राज्य योजनेन्तर्गत योजना (२२१६०७९७)"

११. हा शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्ग, विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग, आदिवासी विकास विभाग तसेच नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक प्र.क्र.अ.स.६३५/व्यय-३, दि.१९.७.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( म.गु.खांबडे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परीक्षा
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा
८) संचालक, नगर पालिका प्रशासन, मुंबई
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व महानगरपालिका आयुक्त /प्रशासक
११) मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई

GR- 20020122155851000-1700

१२) उपमुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग
पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१३) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व नगरपरिषदा/नगर पालिका अध्यक्ष/ मुख्य अधिकारी
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा परीक्षक अधिकारी, मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) वित्त नियंत्रक, म्हाडा, मुंबई
२०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रे (पूर्व), मुंबई -४०० ०५१.
२१) मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/नागपूर/औरंगाबाद/पुणे/नाशिक व अमरावती, गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ.
२२) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
२३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यय-३) व अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई
२४) नियोजन विभाग (का.१४७४) मंत्रालय, मुंबई,
२५) समाज कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६) विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्ग विशेष मागासप्रवर्ग, कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२७) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
२८) महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२९) संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे/

३०) उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्य आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग(सनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (रजिस्टर पोस्टाने),
३१) सहसंचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
३२) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी.
३३) सह सचिव (नवि २९) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३४) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३५) सहाय्यक संचालक लेखा, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३६) अवर सचिव (अर्थसंकल्प) गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३७) निवड नस्ती-१

शाशकीय मु.व.लेखन, ५५:50 000 GND GR AUG 2000

GR-200201221558 51000-1700

## जोडपत्र - १

# महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण
# झोपडपट्टी सुधारणा कार्यक्रम (एस.आय.पी.)

### एस.आय.पी.कार्यक्रम राबविण्यांत येणा-या ६१ शहरांची यादी.

| अ.क्र. | नगर /शहराचे नांव |
|---|---|
| | **अ)कोकण गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ** |
| १ | ठाणे |
| २ | उल्हासनगर |
| ३ | कल्याण |
| ४ | कुलगांव,बदलापूर |
| ५ | भिवंडी |
| ६ | नवी मुंबई |
| ७ | मिराभाईंदर |
| ८ | नाला सोपारा |
| ९ | रत्नागिरी |
| १० | पनवेल |
| ११ | विरार |
| | **ब) पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ** |
| १२ | पुणे |
| १३ | पिंपरी-चिंचवड |
| १४ | कोल्हापूर |
| १५ | इचलकरंजी |
| १६ | सोलापूर |
| १७ | बार्शी |
| १८ | पंढरपूर |
| १९ | सांगली |
| २० | मिरज |
| २१ | सातारा |
| २२ | कराड |
| | **क) नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ** |
| २३ | नागपूर |
| २४ | कामठी |
| २५ | वर्धा |
| २६ | हिंगणघाट |
| २७ | भंडारा |
| २८ | गोंदिया |
| २९ | चंद्रपूर |
| ३० | बल्लारपूर |

GR-20020122155851000-1700

## ड) अमरावती गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ

| | |
|---|---|
| ३१ | अमरावती |
| ३२ | अचलपूर |
| ३३ | यवतमाळ |
| ३४ | खामगांव |
| ३५ | अकोला |
| ३६ | अकोट |
| ३७ | बुलढाणा |
| ३८ | मलकापूर |
| ३९ | पुसद |

## ई )औरंगाबाद गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ

| | |
|---|---|
| ४० | औरंगाबाद |
| ४१ | जालना |
| ४२ | परभणी |
| ४३ | बीड |
| ४४ | नांदेड |
| ४५ | लातूर |
| ४६ | उदगीर |
| ४७ | परळीवैजनाथ |
| ४८ | अंबेजोगाई |
| ४९ | उस्मानाबाद |
| ५० | हिंगोली |

## फ) नाशिक गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ

| | |
|---|---|
| ५१ | नाशिक |
| ५२ | मालेगांव |
| ५३ | मनमाड |
| ५४ | अहमदनगर |
| ५५ | श्रीरामपूर |
| ५६ | धुळे |
| ५७ | नंदुरबार |
| ५८ | जळगांव |
| ५९ | भुसावळ |
| ६० | अंमळनेर |
| ६१ | चाळीसगांव |

GR-200201221558510001-1700

मशिवर्स.५३४.(५०००)-२०००-५०,००० GND GR AUG 2000

## जोडपत्र - २

## समितीची कार्यकक्षा व अधिकार:-

(१) योजनेसाठी लागणा-या सुयोग्य जमिनीजिल्हाधिकारी यांचेमार्फत विनामुल्य अथवा नाममात्र दराने उपलबध करुन देणे.

(२) प्रस्तावित योजनेतील घरांचे बांधकाम लाभार्थीकडून करावयाचे असल्याने अत्यल्प, या प्रवर्गातील लाभार्थी, प्रचलित पध्दतीने ठरविण व त्यांची यादी जाहीर करणे, लाभार्थी ठरवितांना, कुटुंब नियोजनाचे पालन करणा-या लाभार्थींना या योजनेमध्ये प्राधान्य देणे. तसेच सदरहू सदनिकेचा प्रथम हक्क तथा वारसा कुटूंबातील महीलेच्या नांवे जमिनीचा भाडेपट्टा देण्यात यावा.

(३) वरीलप्रमाणे कार्यवाही करुन, समितीने या योजनेमध्ये बांधावयाच्या, त्यांच्या जिल्हयासाठी ठरवून दिलेल्या, एकुण सदनिकेचा सविस्तर प्रस्ताव तयार करावा. प्रस्तावित योजनेचे आराखडे व घरांचे आरखडे तयार करुन समितीने प्रथमतः ते मंजूर करावेत व स्थानिक शासकिय व सक्षम प्राधिकरणाकडून त्यास मंजूरी घ्यावी. यामध्ये प्रवर्गनिहाय एकूण सदनिकाची संख्या, अंदाजपत्रकीय खर्च, एकुण सदनिकेस अनुसरुन राज्य शासनाकडून प्राप्त करुन घ्यावयाचे अनुदान, ज्या ठिकाणी विशेष घटक योजना असेल त्या बाबत केंद्र शासनाकडून मागणी करावयाचे अनुदान, तसेच एकुण सदनिकेच्या संख्येनुसार आवश्यक असणारे कर्ज असा सविस्तर प्रस्ताव तयार करावा. या प्रस्तावास प्रशासकिय मान्यता जिल्हाधिकारी देतील.

(४) योजनेचे प्रस्ताव तयार करतांनाच दरम्यानच्या काळात, प्रस्तावित योजनेसाठी लागणा-या सामायिक सुविधा जसे पाणी, बीज, मलनिःसारण, रस्ते संबधित संस्थेच्या संबंधीत योजनेखाली पुरविण्याची कार्यवाही तथा आदेश निर्गमित करणे.

(५) या योजनेसाठी जिल्हाधिकारी यांनी पुढाकार घेऊन लाभाधारकांना उपलब्ध असल्यास निर्मिती केंद्रामार्फत आवश्यक ते सहकार्य उपलब्ध करुन द्यावयाचे आहे. जसे निर्मिती केंद्रामध्ये तयार होणारा माल किंमत आकारुन उपलब्ध करुन देणे, आवश्यक तिथे

GR-20020122155851000-1700

ह भार्थींना तसेच स्थानिक तांत्रिक, शैक्षणिक संस्थांच्या विद्यार्थ्यांच्या
म तीने सदरहू केंद्र चालवणे व प्रशिक्षण देणे इत्यादी कामे करणे.

(७) जनेच्या लाभार्थींना घरबांधणीच्या प्रगतीस अनुसरून शासनाकडून प्त होणारे अनुदान व कर्ज उपलब्ध करून देणे. लाभधारकांनी रांचे बांधकाम मंजूर नकाशाप्रमाणे करावयाचे आहे. या धकामाबाबत मार्गदर्शन लाभार्थ्यांच्या आवश्यकतेप्रमाणे स्थानिक डळाच्या अधिकाऱ्यांनी करावयाचे आहे. तसेच कामाच्या तीनुसार दाखला देऊन टप्प्याटप्प्याने अनुदान तथा कर्ज लाभार्थीस पलब्ध करून देण्याची व कर्ज वसुलीची कार्यवाही समितीने तथा लहाधिकारी यांनी करावयाची आहे. यासाठी योग्य ती र्यपध्दती अवलंबिली जाईल. यात लाभार्थ्यांनी स्वतःचे खाते सुरु रावयाचे आहे.

ामध्ये शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाप्रमाणे बदल के ला जाईल.

GR-200201221558 51000-1700